**धुळे वनवृत्तातील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशी एकूण ४ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एफएसटी-०२/२०/प्र.क्र.५९/फ-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३० मार्च, २०२०

वाचा :- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.३१ (१९-२०)/१७७१, दि.१८.०२.२०२०

२) शासन निर्णय क्र.एफएसटी-०४/१६/प्र.क्र.११८/फ-४, दि.१४.१०.२०१९.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२..२०२०

**शासन निर्णय :-**

धुळे वनवृत्तातील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ४ (चार) अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. धुळे वनवृत्तातील ४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे.

३. उक्त परिस्थितीत धुळे वनवृत्तातील ४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**धुळे वनवृत्त कार्यालयातील ४ पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीव (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| **उपगौण शीर्ष** | ०१ संचालन व प्रशासन |
| | (०१)(०२) प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२ ०१) |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/आ.पु.क, दि.१२.०२.२०२० मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१७४६५८७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत :- विवरणपत्र "अ"**

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2020.03.30 17:50:55 +05'30'

**( बा. सि. शिंदे )**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे वनवृत्त, धुळे.
५) विभागीय वन अधिकारी, उत्तर धुळे वनविभाग, धुळे/पश्चिम धुळे वनविभाग/ धुळे/मेवासी वन विभाग, तळोदा/यावल वन विभाग, यावल/जळगांव वनविभाग, जळगांव.
६) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०२/२०/प्र.क्र.५९/फ-४,**
**दि. ३०.०३.२०२०**
**विवरणपत्र "अ"**
**धुळे वनवृत्तातील २०२०-२०२१ मध्ये दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदांची यादी**

| अ. क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/ पदे २०१९-२०२० यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) | १ | शा.न.म.व.व.वि.क्र. एफडीएम-१८८०/१/फ-२ दि.२९.८.१९८३ व एएफओ-१००४/ प्र.क्र.१९५/फ-२, दि. ११.६.२००४ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.११८/फ-४, दि.१४.१०.२०१९ |
| २ | विभागीय वन अधिकारी | २ | शा.न.म.व.व.वि.क्र. एफडीएम-१८८०/१/फ-२, दि.२९.८.१९८३ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र. ११८/फ-४, दि.१४.१०.२०१९ |
| ३ | वरिष्ठ सांख्यिकी सहाय्यक | १ | शा.न.म.व.व.वि.क्र. एफडीएम-१८८०/१/फ-२ दि.२९.८.१९८३ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र. ११८/फ-४, दि.१४.१०.२०१९ |

***************